**१०० कोटी लागवडीचे उद्दिष्ट साध्य करण्याबाबत मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**

कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : शकोवृ- २०११/प्र.क्र.२७५/९-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.
दिनांक- १७ नोव्हेंबर, २०११

**वाचा:-** १) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र-एफडीएम-२०११/प्र.क्र.१०४/फ-२, दि. २५.१०.२०११
२) शासन परिपत्रक, नियोजन विभाग (रोहयो प्रभाग) क्रमांक- मग्रारोहयो-२०११/ प्र.क्र.८४/रोहयो-१, दि. १.११.२०११
३) शासन निर्णय, नियोजन विभाग (रोहयो प्रभाग) क्रमांक- मग्रारो-२०११/ प्र.क्र.८५/रोहयो-१, दि. ३.११.२०११

**शासन परिपत्रक :**

संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील परिपत्रकान्वये सन २०१२-२०१७ या पंचवार्षिक कालावधीत ५०० कोटी वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट निर्धारीत करण्यात आले आहे. हे उद्दिष्ट शासनाच्या विविध विभागांमार्फत राबविण्यात येणार आहे. सदर परिपत्रकान्वये सन २०१२ च्या पावसाळयात वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट १०० कोटी करण्यात आले आहे. परिपत्रकात सन २०१२ च्या पावसाळयामध्ये कृषि विभागामार्फत ३४.८४ कोटी इतक्या वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट प्रस्तावित करण्यात आले आहे.

२. संदर्भ क्रमांक २ येथील परिपत्रकान्वये नियोजन विभागाने (रोहयो प्रभाग) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत वन व समाजिक वनीकरण विभागामार्फत घ्यावयाच्या कामासंदर्भाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. (सदर परिपत्रक राज्य शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक क्रमांक २०११११०२१५१२५५००१ असा आहे.)

३. संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत रोपवाटिका तयार करणे व वृक्ष लागवड करणे यासाठी तांत्रिक व आर्थिक मापदंडाच्या मार्गदर्शक सूचना विहित केलेल्या आहेत. ( सदर परिपत्रक राज्य शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक क्रमांक २०११११०२१५४४२२००१ असा आहे.)

४. संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये व संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचना कृषि विभागाने शतकोटी वृक्ष लागवड करताना अवलंबाव्यात.

५. सदर परिपत्रक राज्य शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक क्रमांक- २०११११७१०२२४३००१ असा आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( अ.रा.राणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

प्रति,

१. आयुक्त कृषि ,महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक फलोत्पादन,कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
४. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
५. ग्रंथपाल,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
६. माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई ३२
७. निवडनस्ती (९-अे)